**पुराभिलेख संचालनालय, मुंबई या कार्यालयाच्या नुतनीकरण करण्याच्या कामांतर्गत करावयाच्या विद्युतसंच मांडणीच्या अनुषंगाने येणाऱ्या खर्चास वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मपुवि-२०२३/प्र.क्र.२१३/सां.का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई
दिनांक : ३१ मार्च, २०२४

**वाचा :** १. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. मपुवि-२०२३/प्र.क्र.१३४/सां.का.२, दिनांक २३ जून २०२३

२. कार्यकारी अभियंता (विद्युत), दक्षिण मुंबई विद्युत विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांचे पत्र क्र. काअ/दमुंविवि/स्विय/५५८५/२०२३, दिनांक २७ ऑक्टोबर, २०२३.

३. संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई यांचे पत्र जा.क्र. पुरा.संचा./प्रशा/का.बैठक व्यवस्था/२०२३/बी-३९७१, दिनांक ३० ऑक्टोबर, २०२३.

४. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. मपुवि-२०२३/प्र.क्र.२१३/सां.का.२, दिनांक ०२ नोव्हेंबर, २०२३.

५. उप संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. जा.क्र. पुरा.संचा/लेखा/लेअ./२०२३/बी/४४५७, दिनांक २८ मार्च, २०२४.

**प्रस्तावना** :

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या अधिपत्याखालील पुराभिलेख संचालनालय कार्यालयाचे नुतनीकरण करण्याच्या कामांतर्गत करावयाच्या विद्युतसंच मांडणीच्या कामासाठी येणाऱ्या खर्च रु.१७,३९,९२७/- (रुपये सतरा लक्ष एकोणचाळीस हजार नऊशे सत्तावीस फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास उपरोक्त संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर कामासाठी रु.१६,७२,८४०/- इतक्या रकमेची आवश्यकता असून सदर खर्चास वित्तीय मान्यता देण्याची विनंती पुराभिलेख संचालनालय, मुंबई कार्यालयाकडून उपरोक्त संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये करण्यात आली आहे. त्यानुसार सदरहू प्रस्तावास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

पुराभिलेख संचालनालय, मुंबई कार्यालयाच्या उपरोक्त संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेल्या नुतनीकरण करण्याच्या कामांतर्गत करावयाच्या विद्युतसंच मांडणीच्या कामासाठी रु.१६,७२,८४०/- (रुपये सोळा लक्ष बहात्तर हजार आठशे चाळीस फक्त) इतक्या खर्चास सदर शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदरचा निधी ठेव अंशदान निधी म्हणून सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. उपरोक्त कामासाठी होणारा खर्च, मागणी क्र. "झेडडी-२, प्रधान लेखाशिर्ष २२०५, कला व संस्कृती (०१) (०२) पुराभिलेख कार्यालये (अनिवार्य) **(२२०५ १७९५) १३- कार्यालयीन खर्च**" या लेखाशीर्षाखालील सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील मंजूर निधीतून भागविण्यात यावा.

०३. संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई यांना यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दिनांक २०सप्टेंबर, २०१९ नुसार तसेच, सार्वजनिक बांधकाम विभाग शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण २०१२/प्र.क्र.१०/इमा-२, दिनांक २५ सप्टेंबर, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारानुसार तसेच, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-५ अ.क्र.१०, परिच्छेद क्र.१३४ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३३११७३८३७५४२३ असा असून, हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2024.03.31 17:48:18 +05'30'

**(सुमंत पाष्टे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री, तथा वित्त मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल लेखा परीक्षा / लेखा अनुज्ञेयता महाराष्ट्र, मुंबई
८. उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सह सचिव (व्यय-१५, वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
११. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१४. संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई
१५. अवर सचिव (अर्थसंकल्प) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.निवडनस्ती, सां.का.२